“प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पूरक अनुदान” या योजनेअंतर्गत रु. ८,३५,२१,३४५ /- इतकी रक्कम वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.८३/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १८ नोव्हेंबर, २०१९.

वाचा -

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११ अे, दि. ३१.५.२०१९
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११अे,दि.१३.०८.२०१९,
३. कृषि व पदुम विभाग, शासन परिपत्रक क्र. प्रपिवियो-२०१९/प्र.क्र.१२/११ अे, दि. ११.०९.२०१९
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृषिआ/सां.८/न्युन.१०००/६३३/२०१९, दि.२४.१०.२०१९

**प्रस्तावना -:**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप २०१८ मध्ये राज्यात भारतीय कृषि विमा कंपनी, इफको टोकियो जनरल इंशुरन्स कंपनी इंशुरन्स कंपनी, आयसीआयसीआय लोम्बार्ड कंपनी लि. व ओरिएन्टल जनरल इंशुरन्स कंपनी या ४ विमा कंपन्यांमार्फत तसेच रब्बी २०१८-१९ मध्ये बजाज अलायन्झ जनरल इन्शुरन्स कं.लि, फ्युचर जनरली इन्शुरन्स कं.लि. व भारती ॲक्सा इन्शुरन्स कं.लि. या ३ कंपन्यांमार्फत राबविण्यात येत आहेत. योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार पात्र शेतकऱ्यांना नुकसान भरपाई निश्चित करण्याची कार्यवाही करण्यात असून काही प्रकरणी पिक विमा नुकसान भरपाई अत्यंत कमी प्रमाणाम परिगणीत होत आहे. अशा प्रकरणांमध्ये लाभार्थी शेतकऱ्यांना विम्याच्या परताव्यापोटी नुकसान भरपाई रक्कम रु.१०००/- पेक्षा कमी येत असल्याने किमान रक्कम रु.१०००/ अदा करण्यासंदर्भात संदर्भ क्र. (१) अन्वये निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र. (४) च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार रु. ८,३५,२१,३४५ /- इतकी रक्कम प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान या योजनेसाठी खरीप हंगाम २०१८ साठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान” कृषि आयुक्तालयाने प्रस्तावित केल्यानुसार खरीप हंगाम २०१८ साठी रु. ८,३५,२१,३४५ /- इतकी रक्कम वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (१०) प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान**
**(२४०१ B०५२) (अनिवार्य)**
**३३, अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी प्रधानमंत्री फसल विमा योजनेंतर्गत पुरक अनुदान योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनूसारच खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २६३/२०१९/व्यंय-१, दि. १५.११.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११८१५२५३९०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeta Eknath Shinde

Digitally signed by Neeta Eknath Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, serialNumber=f325d659f47933958aa2d98f394db95f94be57548776492ba36e77ea1c4aa53b, cn=Neeta Eknath Shinde
Date: 2019.11.18 15:29:21 +05'30'

**( निता शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
८. वित्त विभाग (व्यय-१/ अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई- ३२
९. उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१०. कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
११. प्रधान सचिव (मा. राज्यपाल कार्यालय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२

१२.सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२

१३.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३

१४.विभागीय व्यवस्थापक, ओरिएन्टल जनरल इंशुरन्स कंपनी, मेफेअर टॉवरर्स, पुणे- मुंबई रोड, वाकडेवाडी-पुणे-४११००५.

१५.विभागीय व्यवस्थापक, इफको टोकियो जनरल इंशुरन्स कंपनी इंशुरन्स कंपनी, कपील टॉवर, संगमवाडी, पुणे ४११००१.

१६.विभागीय व्यवस्थापक, आयसीआयसीआय लोम्बार्ड कंपनी लि., सोहराब हॉल, स्टेशन संगमवाडी, पुणे ४११००१.

१७.विभागीय व्यवस्थापक, बजाज अलायन्झ जनरल इंन्शुरन्स कं.लि, कॉमर झोन, पहिला मजला, सम्राट अशोक मार्ग, फुले नगर, पुणे ४११००६.

१८. विभागीय व्यवस्थापक, फ्युचर जनरल इंन्शुरन्स कं.लि., क्र.१०-१२ , पहिला मजला, कल्याणी नगर, पुणे ४११००६.

१९.विभागीय व्यवस्थापक, भारती ॲक्सा इंन्शुरन्स कं.लि. , मिलीनीयम स्टार, रुबी हॉस्पीटल जवळ, पुणे-४११००१.

२०.निवड नस्ती (कार्यासन ११-अे).